“राजर्षी शाहू महाराज ज्येष्ठ साहित्यिक व कलावंत यांना मानधन सन्मान योजना” या योजनेंतर्गत लाभार्थ्यांना प्रत्यक्ष लाभ हस्तांतरण (डीबीटी) द्वारे मानधन अदा करण्यासाठी Adhar Authentication Service टूल कीटसाठी निधी उपलब्ध करुन देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण ८२२४/प्र.क्र.४८ (भाग-२)/सां.का.४**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३० मार्च, २०२४

**वाचा :-** १) आधार मुख्यालय, भारत सरकार यांचे दिनांक २५ नोव्हेंबर, २०१९ चे परिपत्रक
२)संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचे पत्र क्र. सां.का.स. ५०७, दिनांक २९ जानेवारी, २०२४
३) व्यवस्थापकीय संचालक, माहिती व तंत्रज्ञान यांचे दिनांक ५ मार्च, २०२४ रोजीचे पत्र.
४) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. वृकमा ४३२१(१५)/ प्र.क्र.१४५/ सां.का.४, दिनांक १६ मार्च, २०२४.

**प्रस्तावना :-**

“राजर्षी शाहू महाराज ज्येष्ठ साहित्यिक व कलाकार मानधन सन्मान योजना” या योजनेंतर्गत सद्यस्थितीत बँकेद्वारे लाभार्थ्यांच्या खात्यात मानधन जमा करण्यात येते. तथापि, उपर्निर्दिष्ट १ अन्वये लाभार्थ्यांना थेट बँक खात्यामध्ये मानधन अदा करण्याबाबत आधार क्रमांकाच्या सहाय्याने लाभार्थ्यांची पडताळणी करुन कार्यवाही करण्याचे सूचित केलेले आहे. त्या अनुषंगाने उपर्निर्दिष्ट ३ अन्वये महा आयटी यांनी या प्रयोजनार्थ शुल्क आकारणीबाबत प्रस्ताव शासनाकडे सादर केला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ मर्या. या संस्थेकडे प्रत्यक्ष लाभ हस्तांतरण (डिबीटी) या प्रयोजनार्थ Adhar Authentication Service टूल कीट व इतर अनुषंगीक बाबींसाठी लागणारे आवश्यक शुल्क अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

“राजर्षी शाहू महाराज ज्येष्ठ साहित्यिक व कलावंत मानधन सन्मान योजना” या योजनेमधील लाभार्थ्यांना महाडीबीटी पोर्टलवरुन निधी वितरीत करण्याकरीता आवश्यक असलेल्या Adhar Authentication Service टूल कीट व इतर अनुषंगिक बाबींसाठी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ मर्या. या संस्थेस रुपये ५४,२५,००९/- इतका निधी वर्ग करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

याबाबतचा तपशिल खालीलप्रमाणे :-

| अ.क्र. | बाब | रक्कम रुपये |
|---|---|---|
| १. | Staffing and Development charges | १०,००,८७९/- |
| २. | Approx Production Server Charges (१२ months) | १८,०३,१८४/- |
| ३. | Support and Maintenance (O&M) | २६,०५,१०६/- |
| ४. | Approx. SMS (३३,००० beneficiary x १२ month) x ०.०४ paise | १५,८४०/- |
| | Approximate Expense | **५४,२५,००९/-** |

०२. सदर खर्च मागणी क्र. झेड डी-२, मुख्यलेखाशिर्ष २२०५- कला व संस्कृति-(००) ८०० इतर खर्च (०१) (०१) साहित्य, कला इत्यादि क्षेत्रातील मान्यवर व्यक्तींना आर्थिक सहाय्य (२२०५ १९०१) ५० इतर खर्च (अनिवार्य) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १०७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४० / अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३३०१५३९१११५२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BALASAHEB
ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2024.03.30 15:59:09 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. प्रधान सचिव, (माहिती तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

४. उप सचिव ( सां.का.४) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
५. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ४०० ०३२
६. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई
७. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०.महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
११.महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१४. निवड नस्ती, सां.का.४.